GR-2004/0031427450-1201

माजी मालगुजारी तलावांची विशेष दुरुस्ती करण्यांबाबत.

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
शासन निर्णय क्र. लपायो १०९५/प्र.क्र.२६६/जल-२ अ
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.
दिनांक -१५.५.९६

पहा-शासन निर्णय क्र. आय . आर. जी १०८७/प्र.क्र.११७४२/३५.मंत्रालय, मुंबई-४०० ३२ दिनांक ३१ मार्च १९८७.

**प्रस्तावना-**

जिल्हा परिषदेकडील लघुसिंचन तलाव ( स्थानिक स्तर ) मालगुजारी तलाव, पाझर तलाव, गांवतळी इ. ब-याच वर्षापूर्वी पूर्ण झालेल्या व कार्यान्वीत असलेल्या प्रकल्पाचा सतत वापर झाल्यामुळे सदर प्रकल्पाची दुरुस्ती करणे, तसेच सुधारणा करुन जनतेच्या आधुनिक व बदलत्या गरजांप्रमाणे प्रकल्पाचे नुतनीकरण करण्याच्या संदर्भात वरील परिपत्रकाप्रमाणे मार्गदर्शक सूचना देण्यांत आलेल्या आहेत.

२. ऑक्टोबर, १९९२ पासून राज्यातील ० ते २५० हेक्टर सिंचन क्षमतेच्या लघुपाटबंधारे (स्थानिक स्तर ) तलावाचे सर्वेक्षण, बांधकाम व पाणी व्यवस्थापन योग्य रितीने राबविण्यांसाठी जलसंधारण खात्याची निर्मिती करुन सदरील काम मुख्य अभियंता, लघु पाटबंधारे ( स्थानिक स्तर ) त्यांच्या अंतर्गत सोपविण्यांत आले आहे. ० ते १०० हेक्टर सिंचन क्षमता असलेल्या लघुपाटबंधारे प्रकल्पाची जबाबदारी जिल्हा परिषदेकडे असून १०१ ते २५० हेक्टर सिंचन क्षमतेचा प्रकल्प नव्याने निर्माण केलेल्या लघुसिंचन ( स्थानिक स्तर ) यांचेकडे सोपविला आहे.

३. वरील सर्व प्रकारच्या प्रकल्पांचे नुतनीकरण दुरुस्ती रोजगार हमी योजनेखाली करण्याच्या संदर्भात मुख्यत्वे मालगुजारी तलाव जे सुमारे , २५० ते ३०० वर्षापूर्वी खाजगी मालगुजारांनी बांधलेले आहेत. त्यांचे नुतनीकरण/ दुरुस्तीचे संदर्भात काही अडचणी निर्माण झाल्या आहेत. माजी मालगुजारी तलाव, १९५२१ सालानंतर शासनाने ताब्यात घेतले असून व सदरील तलावापासून कृषि उत्पन्न वाढत असल्यामुळे सामाजिक बांधिलकी हा दृष्टीकोन ठेवून आदिवासी भागातील मालगुजारी तलावाचे नुतनीकरण/ विशेष दुरुस्ती तसेच सदरील तलावाचे पाणी साठे पुर्नप्रस्थापित करण्यांची जनतेकडून सातत्याने मागणी होत असते. जलसंधारण खात्यांतर्गत ( ० ते २५० हेक्टर सिंचन क्षमता ) माजी मालगुजारी तलावाचे पुर्नप्रस्थापन करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. वरील परिपत्रकातील मार्गदर्शक सूचना लक्षात घेऊन व मालगुजारी तलावाचे संदर्भातील अडचणी लक्षात घेऊन माजी मालगुजारी तलावाचे पुर्नप्रस्थापनेसाठी सर्वकष अभ्यास करुन माजी मालगुजारी तलावाचे पुर्नप्रस्थापनेसाठी सर्वकष अभ्यास करुन माजी मालगुजारी तलावाच्या दुरुस्ती संबंधीचे यापूर्वीचे सर्व शासन निर्णय/ आदेश याव्दारे निष्प्रभावित करुन शासन आता पुढीलप्रमाणे आदेश देत आहे.

## शासन निर्णय-

माजी मालगुजारी तलावाची दुरुस्ती मुख्यत: रोजगार हमी योजनेंतर्गत करण्यांत यावी पण रोजगार हमी योजनेच्या ६०:४० या प्रमाणांत बसत नसेल तर , ही दुरुस्ती जलसंधारण विभागाच्या नियमित निधीतून करण्यांत यावी.

## प्रशासकीय बाबी.

१) ज्या लाभधारकांच्या वाजिब-उल-अर्ज या दस्तऐवजीत माजी मालगुजारी तलावाचे पाणी विनामुल्य वापरण्याचा उल्लेख आहे. अशा लाभधारकांनी लेखी मागणी केल्यानंतर व हया अर्जाची शहानिशा करुन त्यानंतरच मालगुजारी तलवांची विशेष दुरुस्ती करण्यात यावी.

२) ज्या शेतक-याची वाजिब-उल-अर्ज या दस्तऐवजात माजी मालगुजारी तलावाचे पाणी विनामूल्य वापरण्याचे उल्लेख आहे. अशा शेतक-यांना सिंचनाकरिता पाणी उपलब्ध करुन दिल्यानंतर जर अतिरिक्त पाणी शिल्लक असेल तर ते पाणी इतर शेतक-यांनाही त्यांच्या गरजेप्रमाणे व मागणीनुसार उपलब्ध करुन द्यावे व पाण्याच्या वापराबद्दल त्या शेतक-यांकडून प्रचलित नियमानुसार पाणीपट्टी वसूल करण्यात यावी.

३) या दुरुस्तीच्या कामाचे सर्वेक्षण जो पावेतो या सर्वेक्षणाकरिता वेगळी यंत्रणा कार्यान्वित होत नाही तो पावेतो सद्यस्थितीत जलसंधारण विभागाकडे असणा-या ( जिल्हा परिषदेकडे असलेल्या यंत्रणेसह ) करण्यांत यावी.

४) ज्या तलावातून पिण्याच्या पाण्याच्या वापराकरिता मागणी आहे अशा तलावांची प्राधान्याने दुरुस्ती करण्यांत यावी.

## तांत्रिक बाबी

५) एका गावात जर एकापेक्षा जास्त माजी मालगुजारी तलाव असतील व त्या तलावातील पाण्याचा येवा एकमेकांशी संलग्नीत असेल तर या सर्व तलावांना एक पाणलोट क्षेत्र समजून दुरुस्तीचा प्रस्ताव तयार करण्यांत यावा.

६) माजी मालगुजारी तलावाच्या क्षेत्रातील प्रचलित पीक पध्दतीनुसार पाण्याची गरज, पाण्याचा येवा व तलावाचा वापर याप्रमाणे प्रकल्पाचे नियोजन करण्यांत यावे.

७) माजी मालगुजारी तलावांचे पुर्नस्थापन करतांना पाणी साठा वाढविण्यांसाठी जादा बुडीत क्षेत्राची आवश्यकता असल्यास सदरील जमिन संबंधित सुधारकांनी शासनास विनामुल्य उपलब्ध करुन दिला पाहिजे.

८) ज्या तलावामध्ये पाण्याचा येवा प्रकल्पीय पाणी साठ्यापेक्षा कमी असल्याचे आढळून आल्यास पाणी साठा वाढविण्याच्या दृष्टीने आजूबाजूच्या नाल्यातील पाणी या तलावामध्ये वळविण्यांत यावे.

९) जलविमोचक १:३:६ सिमेंट कॉंक्रीटचे प्लग टाईप बांधण्यांत यावे जलविमोचकांच्या स्थळासंबंधी शेतक-यांशी चर्चा करण्यांत यावी.

१०) माजी मालगुजारी तलावापासून सद्यस्थितीत होणारे प्रत्यक्ष सिंचन व तलावाच्या दुरुस्तीनुए होणारी सिंचन वाढ प्रकल्प अहवालामध्ये दर्शविण्यांत यावी.

११) माजी मालगुजारी तलावाची मूळची साठवण क्षमता किती कमी झाली व दुरुस्तीनंतर साठवण क्षमता किती प्रस्थापित होणार हे सविस्तर सर्वेक्षण करुन प्रकल्प अहवालात नमूद करावे.

१२) माजी मालगुजारी तलावाच्या दुरुस्तीमध्ये पालीची दुरुस्ती व पालीची उंची वाढविणे, सांडव्याची दुरुस्ती, विमोचक दुरुस्ती व जेथे आवश्यक असेल तेथे नवीन विमोचक बसविणे, स्पील चॅनलचे खोदकाम व आवश्यक तेथे कालव्याची दुरुस्ती इ. अनुषंगिक बाबींचा समावेश करुन प्रकल्प अहवाल तयार करण्यांत यावा.

१३) माजी मालगुजारी तलावाच्या दुरुस्तीनंतर त्या पासून होणारे फायदे प्रकल्प अहवालामध्ये नमूद करावे यामध्ये मत्स्य व्यवसाय, शिंगाड्याची शेती, कमळांची शेती इ.चा उल्लेख करावा.

## प्रकल्पाला तांत्रिक मान्यता.

१) ० ते १०० हेक्टर सिंचन क्षमतेच्या माजी मालगुजारी तलावाच्या दुरुस्तीच्या प्रस्तावास तांत्रिक मंजूरी, पाटबंधारे खात्याच्या प्रचलित नियमानुसार देण्यांत यावी. कार्यकारी अभियंता, जिल्हा परिषद व कार्यकारी अभियंता ( स्थानिक स्तर ) रु २.०० लाख किंमतीच्या प्रकल्पास तांत्रिक मान्यता देण्यास सक्षम आहेत. त्या पेक्षा अधिक किंमतीच्या प्रस्तावास तांत्रिक मान्यता देण्याचे अधिकार अधिक्षक अभियंता यांच्याकडे राहील.

## प्रशासकीय मान्यता

१) ० ते १०० हेक्टर सिंचन क्षमतेच्या माजी मालगुजारी तलावाच्या दुरुस्तीच्या प्रस्तावास जिल्हा परिषद प्रशासकीय मान्यता देईल.

२) १०१ ते २५० हेक्टर सिंचन क्षमतेच्या माजी मालगुजारी तलावाच्या दुरुस्तीच्या प्रस्तावास शासन स्तरावर प्रशासकीय मान्यता देण्यांत येईल. मात्र हे प्रस्ताव संबंधित अधिक्षक अभियंता व मुख्य अभियंता ( स्थानिक स्तर ) यांचे मार्फत शासनास सादर करावेत.

३) माजी मालगुजारी तलावांच्या दुरुस्तीला शासनाच्या ग्राम विकास विभागाने दिनांक ३१.३.८७ रोजी क्र. आयआरजी १०८७/प्र.क्र.११७४२/३५, मंत्रालय, मुंबई ने काढलेले परिपत्रक माजी मालगुजारी तलावाच्या दुरुस्तीसाठी लागू होणार नाहीत.

## निधीचे नियोजन

जी कामे रोजगार हमी योजनेत घेता येत नाहीत अशा कामांकरिता निधीची उपलब्धता जलसंधारण विभागाच्या नियमित निधीतून करण्यांत येईल व याकरिता लागणारा अतिरिक्त निधी जलसंधारण विभाग उपलब्ध करुन देईल. मात्र त्या बद्दलची मागणी जलसंधारण विभागाने वेगळी बाब म्हणून त्यांच्या वार्षिक अंदाजपत्रकात नोंदवावी. सदर अनुदान शासन स्तरावरुन संबंधित अधिक्षक अभियंता यांना वर्गीकृत करण्यांत येईल व त्यांनी आवश्यकता

पाहून या निधीचे वितरण जिल्हा परिषद कार्यकारी अभियंता व कार्यकारी अभियंता ( स्थानिक स्तर ) यांना करावे.

संनियंत्रण.

या संपूर्ण योजनेचे नियोजन देखभाल, संनियंत्रण इ. बाबींची जबाबदारी अधिक्षक अभियंता, लघु पाटबंधारे ( स्थानिक स्तर ) नागपूर यांची राहील. व ते या योजनेच्या भौतिक आर्थिक प्रगतीचा अहवाल दर महिन्याचे १० तारखेचे आंत शासनास सादर करतील व त्याची प्रत मुख्य अभियंता, लघु पाटबंधारे ( स्थानिक स्तर ) पुणे यांना सादर करतील.

हे आदेश नियोजन विभाग व वित्त विभाग यांच्या अनौपचारिक संदर्भाच्या सीआर १०२ व्यय १५, दिनांक २०.२.९६ अन्वये दिलेल्या सहमतीने काढण्यात आले आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

सही /-

( एम.बी. अप्पलवार )

सहसचिव, महाराष्ट्र शासन.